**आपले सरकार सेवा केंद्राबाबत केंद्र शासनाच्या CSC २.० अंतर्गत मार्गदर्शक सुचनेबाबतच्या तरतूदींमध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन शुद्धीपत्र क्रमांक : मातंसं - ०४८/प्र.क्र.१/२०२५**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
**दिनांक :- ०२ जून, २०२५**

**संदर्भ :** शासन निर्णय क्र. मातंसं १७१६/प्र.क्र. ५१७/३९दिनांक १९/०१/२०१८

**शासन शुद्धीपत्रक : -**

"आपले सरकार सेवा केंद्राबाबत केंद्र शासनाच्या CSC २.० अंतर्गत मार्गदर्शक सुचना याबाबतच्या दिनांक १९ जानेवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयातील **परिच्छेद क्र. २ मधील २.५ (ब) येथील " त्या ग्राम पंचायत क्षेत्रात किंवा नागरी क्षेत्रात झोन / वार्ड भागात CSC-SPV कडे ऑनलाईन नोंदणीकृत CSC केंद्रे (नागरिकांना B२C सेवा प्रदान करत असलेली) "आपले सरकार सेवा केंद्र" दर्जा प्राप्त करण्यासाठी जिल्हाधिकाऱ्यांकडे अर्ज करू शकतात. वर नमूद भौगोलिक क्षेत्रात कार्यरत इतर केंद्रही (CSC-SPV व्यतिरिक्त) अर्ज करण्यास पात्र राहतील, त्या भौगोलिक क्षेत्रात राहणारा कोणताही व्यक्ती ज्याचे केंद्र सुरू नसेल परंतु जो CSC-SPV चे केंद्र मिळण्यासाठी विहित केलेल्या अटी व शर्ती पूर्ण करत असेल, असा व्यक्ती आपले सरकार सेवा केंद्रासाठी अर्ज करण्यास पात्र राहील."**

**या ऐवजी**

**(ब)** "यापुढे, त्या ग्रामपंचायत क्षेत्रात किंवा नागरी क्षेत्रात झोन / वार्ड भागात **खालीलप्रमाणे विहित केलेल्या अटी व शर्ती पूर्ण करत असेल, अशी व्यक्ती "आपले सरकार सेवा केंद्रासाठी" अर्ज करण्यास पात्र राहील.**

१) आपले सरकार सेवा केंद्रासाठी निवड झालेल्या अर्जदारानी MSCIT किंवा नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ इलेक्ट्रॉनिक्स अँड इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी (NIELIT) संस्थेमार्फत राबविलेला Course on Computer Concept (CCC) हा कोर्स उत्तीर्ण केलेला असावा, किंवा निवड झालेल्या अर्जदाराने निवड झाल्याच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत वरीलपैकी किमान एक कोर्स उत्तीर्ण असणे आवश्यक राहील. अन्यथा सदर केंद्राची मान्यता आपोआप रद्द होईल.

२) सदर अर्जदाराकडे त्याचे स्वत:चे PAN आणि आधार कार्ड असावे.

३) तसेच अर्जदार हा त्या भौगोलिक क्षेत्रातील रहिवासी असावा व सदर अर्जदारास मराठी आणि इंग्रजी भाषेचे ज्ञान असावे." असे वाचावे.

**तसेच परिच्छेद क्र. २ मधील २.५ (क)** येथील "**जिल्हाधिकाऱ्यांनी प्राप्त अर्जाची छाननी CSC-SPV यांच्या जिल्हा समन्वयकाकडून करुन घ्यावी. जिल्हा समन्वयकांनी अशा अर्जांची छाननी करावी व परिशिष्ट-ब मधील नमुन्यात माहिती भरुन अहवाल सादर करावा, दि. २३/०८/२००२ च्या शासन निर्णयान्वये स्थापित केलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा सेतू समिती समोर सदर अहवाल ठेवून केंद्रांना, आपले सरकार सेवा केंद्रांचा दर्जा देणेबाबत निर्णय घेण्यात यावा.**

**"आपले सरकार सेवा केंद्र" दर्जा प्रदान करण्यासाठी एका पेक्षा अधिक अर्ज प्राप्त झाल्यास, ज्या केंद्राने मागील ६ महिन्याच्या कालावधीमध्ये BRC (Business to citizen) चे अधिक व्यवहार केले असतील (संख्या), अशा कॉमन सर्विस सेन्टरचा आपले सरकार सेवा केंद्राच्या दर्जा पात्रतेसाठी प्राधान्याने विचार करावा. याबाबत जिल्हाधिकारी, जिल्हा सेतू समिती यांचा निर्णय अंतिम राहील.**

**या ऐवजी**

क) जिल्हाधिकारी कार्यालयात कार्यरत सेतू प्रभारी अधिकारी व जिल्हा प्रकल्प व्यवस्थापक हे संयुक्तरीत्या अर्जाची छाननी पार पाडतील. तसेच दि. २३/०८/२००२ च्या शासन निर्णयान्वये स्थापित केलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा सेतू समिती समोर सदर प्रस्ताव ठेवून आपले सरकार सेवा केंद्र देण्याबाबतचा निर्णय घेण्यात येईल. आपले सरकार सेवा केंद्र प्रदान करण्यासाठी त्या-त्या भौगोलिक क्षेत्रात एकापेक्षा जास्त अर्ज प्राप्त झाल्यास खालीलप्रमाणे प्रक्रिया राबवून गुणांकन करण्यात येईल.

१) समितीव्दारे खालीलप्रमाणे गुणांकनाची व मुलाखतीची प्रक्रिया पार पाडण्यात येईल. तसेच सदर समितीचा निर्णय अंतिम असेल.

२) सदर निवड प्रक्रियेमध्ये १०० गुण निर्धारीत करण्यात येतील तर गुणांची विभागणी खालीलप्रमाणे असेल:-

१) कोणत्याही शाखेचा पदवीधर असल्यास ३० -गुण
२) कोणत्याही शाखेचा पदव्युत्तर असल्यास २५ -गुण
३) सीएससी केंद्र असल्यास २५ -गुण
४) समितीकडील मुलाखतीचे गुण २० -गुण

मुलाखतीच्या गुणांची विभागणी खालीलप्रमाणे राहील:-

- तांत्रिक ज्ञान असल्यास - ०६ गुण
- लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ चे ज्ञान असल्यास - ०४ गुण
- सामान्य ज्ञान व व्यक्तिमत्व, सामाजिक क्षेत्रात राबविलेले उपक्रम अथवा सामाजिक क्षेत्रात केलेल्या कार्याचा अनुभव असल्यास १० - गुण

असे वाचावे.

सदर शासन शुद्धिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०६०२१७५५२९०१०७ असा आहे. हे शासन शुद्धिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार नावाने,

EKNATH KASHINATH GAGARE

Digitally signed by EKNATH KASHINATH GAGARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=General Administration Dep., 2.5.4.20=D9A3CCBC053D2CF9B4C30C85BB8DB0E6C39331B90D48B0ABA6CDE387B5EC208C, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BC79F4A08CA2D5D74E02E7214F6AAD4EF7D9AFDEBA5BFCDEF24D45049099939, cn=EKNATH KASHINATH GAGARE
Date: 2025.06.02 17:56:01 +05'30'

**(एकनाथ गागरे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
४. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
५. मा. उप मुख्यमंत्री, नगरविकास, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. उप मुख्यमंत्री, वित्त व नियोजन, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधान भवन, मुंबई.
९. सर्व मा. मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
११. सर्व अपर मुख्य सचिव/सर्व प्रधान सचिव/विशेष सचिव/सचिव,
१२. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१३. प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ शाखा), मुंबई,
१४. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई,
१५. प्रबंधक, लोक आयुक्त/उप लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१७. महालेखापाल १/२ लेखा व अनुज्ञेयता महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१८. महालेखापाल १/२ लेखा व परिक्षा महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१९. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
२०. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य,
२१. सर्व महानगरपालिका आयुक्त
२२. पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२३. सर्व उप मुख्यकार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषदा
२४. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख
२५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य,
२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२८. निवड नस्ती (का.३९).